गुणवंत मुलींचे शासकीय मागासवर्गीय वसतिगृह,
उल्हासनगर, जि.ठाणे इमारत भाडे मंजूरीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीसीएच -२०१४/ प्र.क्र. २०६/शिक्षण-२
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०१५

वाचा -

१) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र :सकआ/शिक्षण/ शागृह/मुलींचे-उल्हासनगर/ठाणे/इ.भा. मंजुरी/२०१५/का-५अ/२६९०, दि.०१.११.२०१४

शासन निर्णय -

मागासवर्गीय मुला-मुलींसाठी शासकीय वसतिगृहे सुरु करण्याचा निर्णय राज्य शासनाकडून घेण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत मागासवर्गीय मुलींचे(गुणवंत) शासकीय वसतिगृह, उल्हासनगर जि.ठाणे या वसतीगृहासाठी शासकीय जमीन उपलब्ध न झाल्याने श्री.रमेश गुरुबक्षराय सेवलानी, रा.कैलाशपती अपार्टमेंट, चौथा माळा, उल्हासनगर, जि.ठाणे यांच्या मालकीची खाजगी इमारत भाड्याने घेण्यात आलेली असून सदर इमारतीचे क्षेत्रफळ ८९४.०५ चौ.मी.(९६१९.९७८ चौ.फूट) इतके आहे. (तळमजला + २ मजले) सदर इमारतीचा ताबा सहायक आयुक्त समाजकल्याण, ठाणे यांनी दिनांक १६.१२.२०१३ रोजी घेतला असून इमारत मालकासोबत भाडे करार देखील केलेला आहे. सदर इमारतीचे भाडे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे यांनी दरमहा रु. ४, २६,३५५ / (सर्व कर वगळून) इतके प्रमाणित केलेले आहे. भाडे करारातील अटी व शर्ती विचारात घेऊन दिनांक १६.१२.२०१३ ते १५.१२.२०१६ या ३ वर्षाच्या कालावधीकरिता प्रतिमहा रु.४,२६,३५५/-(इतर सर्व कर वगळून) इतक्या रकमेस सदर इमारत गुणवंत मुलींचे शासकीय वसतिगृह, उल्हासनगर या वसतीगृहासाठी भाड्याने घेण्यास या द्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या शासकीय वसतिगृहाकरिता घेतलेल्या इमारतीच्या भाडयाचा तपशिल खालील प्रमाणे आहे :-

| अ. क्र. | इमारत मालकाचेनाव | इमारत | ताबा घेतल्याचा दिनांक | प्रमाणित केलेले भाडे(दरमहा) | क्षेत्रफळ | मंजूर करावयाचे दरमहा एकूण भाडे व कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | श्री.रमेश गुरुबक्षराय सेवलानी, रा.कैलाशपती अपार्टमेंट, चौथा माळा, उल्हासनगर, जि.ठाणे | तळमजला +२ मजले | दिनांक १६.१२.२०१३ | रू.४,२६,३५५/- | ८९४.०५ चौ.मी. (९६१९. ९७८ चौ.फूट) | रू. ४,२६,३५५/- (सर्व कर वगळून) दि.१६.१२.२०१३ पासून दि.१५.१२.२०१६ |

३. महापालीका कर व इतर सर्व कर इमारत मालकाने भरणे बंधनकारक राहिल.

४. सहायक आयुक्त, समाज कल्याण, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासकीय वसतिगृहासाठी संपूर्ण भाड्याची रक्कम संबंधितास यापूर्वी अदा केली असेल तर सदर भाडे रक्कम समायोजित करण्याची कार्यवाही त्यांनी नियमानुसार करावी.

५. सदर इमारत मालकास भाडे अदा करताना आयकर विषयक असणाऱ्या "स्त्रोताच्या कपातीबाबत (Tax deducted at source) नियमानुसार योग्य ती कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

६. यावर होणारा खर्च हा अर्थसंकल्पित लेखाशिर्ष " सामाजिक न्याय विभाग , मागणी क्रमांक एन-३, २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण (०१) (०१), अनुसूचित जातीतील मुले व मुली यांच्याकरिता असलेल्या शासकीय वसतिगृहांचे परिरक्षण (२२२५ ०२८१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखाली केलेल्या सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभाग, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग १ ते ५, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दि.१५ मे, २००९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२११११४३४४२२६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2015.02.20 15:40:40 +05'30'

**(शि.सो.चौरे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, मुंबई.
३. सहायक आयुक्त, समाज कल्याण, ठाणे.
४. महालेखापाल, महाराष्ट्र -१ ( लेखा परिक्षा) / (लेखा अनुज्ञेयता ) /मुंबई .
५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
६. वित्त विभाग, (व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२.
७. श्री.रमेश गुरुबक्षराय सेवलानी, रा.केलाशपती अपार्टमेंट, चौथा माळा, उल्हासनगर,जि.ठाणे.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती.